**नेरळ-ममदापूर संकुल विकास योजना तयार करण्यासाठी नगर रचनाकार, पेण विकास योजना विशेष घटक , पेण, ता. पेण, जि. रायगड हे कार्यालय, जिल्हा परिषद, रायगड-अलिबाग यांचेकडे स्थलांतरित करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.टिपीव्ही- २३१४/२२/प्र.क्र.०३/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २५ फेब्रुवारी, २०१५.

**संदर्भ:-** १. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.टिपीव्ही-२१०९/१२१७/प्र.क्र.२६३/०९/नवि-२७, दि.०८ ऑक्टोबर, २०१०.
२. रायगड जिल्हा परिषद, अलिबाग-रायगड सर्वसाधारण सभा दि.२२.०८.२०१३. **(ठराव क्रमांक ३५८)**
३. मुख्याधिकारी, पेण नगरपरिषद, पेण यांचे पत्र क्र.पेणन/का-२/आस्था/२०१४/४७९, दि.०९.०५.२०१४.
४. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.वियोविघ/पेण-नेरळ ममदापूर (वि.न.प.)/अर्थसंकल्प/३०४३, दि.०५.०६.२०१४.

**प्रस्तावना :-**

पेण, जि. रायगड शहराची सुधारित विकास योजना तयार करण्यासाठी नगर विकास विभागाच्या संदर्भ-१ येथील शासन निर्णयान्वये पेण, जि. रायगड येथे विकास योजना विशेष घटकाची स्थापना करण्यात आली होती. पेण शहराचा सुधारित विकास आराखडा तयार करण्याचे काम पूर्ण झाले असून सद्य:स्थितीत या विकास योजना विशेष घटकाकडे कोणतेही काम शिल्लक नसल्याने आता सदरच्या विकास योजना विशेष घटकाची पेण नगरपरिषदेस आवश्यकता नसल्याने या विकास योजना विशेष घटकाला पदमुक्त करुन ते शासनाकडे वर्ग करुन घेण्याबाबत मुख्याधिकारी, पेण नगरपरिषद, पेण यांनी संदर्भ-३ येथील पत्रान्वये प्रस्ताव सादर केलेला आहे. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, पुणे यांनी त्यांच्या दि.२९.०३.२०१४ च्या पत्रान्वये पेण, जि. रायगड येथील पेण विकास योजना विशेष घटक हे कार्यालय रायगड जिल्ह्यातील "नेरळ-ममदापूर" येथे स्थलातंरित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. त्या प्रस्तावास मंजूरी देण्याबाबत संदर्भ-४ येथील पत्रान्वये विनंती केलेली आहे. तसेच रायगड जिल्हा परिषद, रायगड-अलिबाग यांनी त्यांची सर्वसाधारण सभा, दि.२२.०८.२०१३ मध्ये ठराव क्र.३५८ पारित करुन नेरळ-ममदापूर येथे विकास योजना विशेष घटकाची स्थापना करण्याबाबत विनंती केलेली आहे. या बाबी विचारात घेता नेरळ-ममदापूर, ता. कर्जत, जि. रायगड येथे विकास योजना विशेष घटकाची स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन पुढीलप्रमाणे आदेश देत आहे :-

**शासन निर्णय :-**

नेरळ संकुल विकास प्राधिकरणाची विकास योजना तयार करण्यासाठी निविदा तयार करणे, निविदा प्रसिद्ध करणे, एजन्सीची नेमणूक करणे, एजन्सीकडून विकास योजना तयार करुन घेणे, तयार झालेल्या विकास योजनेला शासनाची मान्यता घेऊन प्रत्यक्ष अमंलबजावणी करणे, बांधकामांना परवानगी देणे, बांधकाम सुरु करणेपूर्वी तसेच चालू असताना वेळोवेळी प्रत्यक्ष पाहणी करुन तपासणी करणे व अनुषंगिक तांत्रिक कामे करणे याकरिता पेण, जि. रायगड येथे कार्यरत असलेले नगर रचनाकार, विकास योजना, विशेष घटक, पेण, जि. रायगड यांचे कार्यालय पुढील तक्त्यात नमूद केलेल्या ०७ पदांसह "नेरळ-ममदापूर" संकुल विकास

योजना तयार करण्यासाठी **दि.०१ मार्च, २०१५ (म.पू.)** पासून **जिल्हा परिषद, रायगड-अलिबाग** यांचेकडे स्थलातंरित करण्यास या आदेशान्वये शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | पदांचे नांव | वेतनश्रेणी (रुपयात) | ग्रेड वेतन रुपयात | एकूण पदे | स्थाय / अस्थायी |
|---|---|---|---|---|---|
| १ | नगर रचनाकार (राजपत्रित गट-अ) | रु.१५,६००-३९,१००. | ५,४०० | १ | अस्थायी |
| २ | सहाय्यक नगर रचनाकार | रु.९,३००-३४,८००. | ४,४०० | १ | अस्थायी |
| ३ | रचना सहायक | (i) रु.९,३००-३४,८००<br>(ii) रु.९,३००-३४,८००<br>(५ वर्षाच्या अर्हताकारी सेवेनंतर सहाय्यक नगर रचनाकार) | ४,३००<br>४,४०० | २ | अस्थायी |
| ४ | कनिष्ठ आरेखक | (i) रु.५,२००-२०,२००.<br>(ii) रु.९,३००-३४,८००<br>(५ वर्षाच्या र्हताकारी सेवेनंतर) | २,४००<br>४,२०० | १ | अस्थायी |
| ९ | अनुरेखक | (i) रु.५,२००-२०,२००.<br>(ii) रु.५,२००-२०,२००<br>(७ वर्षाच्या अर्हताकारी सेवेनंतर) | २,०००<br>२,४०० | २ | अस्थायी |
| | | | **एकूण :-** | ०७ | |

**०२.** महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम २ चा उपखंड (१५) (सी) (१) सहखंड १९ नुसार नेरळ डॉर्मिटरी टाऊनशिप क्षेत्रासाठी जिल्हा परिषद, रायगड-अलिबाग यांना संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र दि.१६.०४.२००२ अन्वये "नियोजन प्राधिकरण" म्हणून नियुक्त करण्यात आले आहे. सबब, जिल्हा परिषद, रायगड-अलिबाग यांनी ठराव पारित केल्यानुसार प्रस्तावित विकास योजना विशेष घटकाकरिता वेतन व भत्ते, कार्यालयास जागा, वाहन, दूरध्वनी, संगणक, स्टेशनरी, फर्निचर इत्यादी बाबींवरील खर्च जिल्हा परिषद, रायगड-अलिबाग यांचेकडून करण्यात यावा.

**०३.** नेरळ-ममदापूर संकुल विकास योजना तयार करण्यासाठी स्थलातंरित करण्यात येत असलेल्या नगर रचनाकार, विकास योजना, विशेष घटक, पेण, ता. पेण, जि. रायगड-अलिबाग या कार्यालयातील उपरोक्त अस्थायी पदांची मुदतवाढ पूर्वी मान्यता देण्यात आल्यानुसार दि.२८.०२.२०१५ पर्यंत चालू राहील. तसेच सदरची अस्थायी पदे दि.०१.०३.२०१५ ते दि.२८.०२.२०१६ या कालावधीत पुढे सुरु ठेवण्याकरिता मुदतवाढ देण्याबाबतची कार्यवाही शासनस्तरावरुन करण्यात येत आहे.

**०४.** नगर रचनाकार, पेण विकास योजना, विशेष घटक, पेण, ता. पेण, जि. रायगड-अलिबाग हे कार्यालय, जिल्हा परिषद, रायगड-अलिबाग यांचेकडे वर्ग करण्याची कार्यवाही संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्यास्तरावर तात्काळ करावी. तसेच, सध्या या विकास योजना, विशेष घटकासाठी मंजूर असलेल्या ०७ पदांपैकी रिक्त असलेल्या पदांवर अधिकारी / कर्मचारी उपलब्ध करुन देण्याबाबत संचालनालयाच्या स्तरावर कार्यवाही करण्यात यावी.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२५१७५९०६४९२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Siddharam Karbasayya Salimath

Digitally signed by Siddharam Karbasayya Salimath
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Siddharam Karbasayya Salimath
Date: 2015.02.25 18:11:51 +05'30'

**( सिध्दाराम सालीमठ )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
२. विभागीय आयुक्त, कोंकण विभाग, कोंकण भवन, नवी मुंबई.

३. जिल्हाधिकारी, जि. रायगड, रायगड-अलिबाग.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड, रायगड-अलिबाग.
५. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण, महाराष्ट्र राज्य, पुणे. **(पाच प्रतीसह).**
६. संचालक, नगर रचना व सह सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सह संचालक, नगर रचना, कोंकण विभाग, कोंकण भवन, नवी मुंबई.
८. नगर रचनाकार, विशेष योजना विशेष घटक, पेण, ता. पेण, जि. रायगड.
९. नगर रचनाकार, विशेष योजना विशेष घटक, नेरळ-ममदापूर, नेरळ, ता. कर्जत, जि. रायगड.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड-अलिबाग, जि. रायगड.
११. कक्ष अधिकारी (नवि-४ / नवि-१३), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती / नवि-२७.

*****